मिळकत पत्रिकांच्या ऑनलाईन फेरफारासाठी
ई- प्रॉपर्टी कार्ड इन्फॉरमेशन सिस्टीम (e-PCIS)
राबविण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राभूअ-२०१६/प्र. क्र. ३५०/ल-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०१७

वाचा : १. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख,) महाराष्ट्र राज्य) पुणे यांचेकडील पत्र क्र. ना.भू./ई प्रॉपर्टी कार्ड/२०१६, दि. २९/०९/२०१६.
२. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि. २७/१/२०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

१.१ महाराष्ट्र राज्यात मालमत्तांच्या मालकी हक्क बदलाबाबत दररोज लाखों दस्तऐवजांच्या नोंदी विविध दुय्यम निबंधक कार्यालयांत होतात. त्याअनुषंगाने सदर दस्तांची त्यांच्या कार्यक्षेत्रातील महसुल अधिकार अभिलेखात तात्काळ नोंद होणे आवश्यक आहे. त्यासाठी गा.न.नं. ७/१२ च्या संदर्भात “ई-फेरफार” ही संगणक प्रणाली विकसित करून राज्यभरात राबविण्यात आलेली आहे.

१.२ महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ चे कलम १२६ अंतर्गत नागरी क्षेत्राचे भूमापन करुन शहर (नागरी)/गावठांण यामधील मिळकतींचे स्वतंत्र नकाशे व अधिकार अभिलेख तयार केले जातात. शहरी भागातील जनतेला अधिकार अभिलेख हे मिळकत पत्रिकांच्या (Property card) स्वरुपात नगर भूमापन अधिकारी कार्यालय तसेच उप अधीक्षक भूमि अभिलेख यांचेमार्फत उपलब्ध होतात. सद्यस्थितीत महाराष्ट्र राज्यात नागरी विभागासाठीचे तसेच **२०००** लोकवस्तीवरील गावठाणांचे अधिकार अभिलेख हे खालील कार्यालयांकडून “मिळकत पत्रिका (प्रॉपर्टी कार्ड)” स्वरूपात जतन केले जातात.

**अ) उप अधीक्षक भूमि अभिलेख कार्यालय** = ३३८
**ब) नगर भूमापन अधिकारी कार्यालय** = ३०
---------
**एकुण कार्यालये** ३६८

**राज्यातील उप अधीक्षक भूमि अभिलेख तसेच नगर भूमापन अधिकारी कार्यालयातील मिळकत पत्रिकांची विभागवार संख्या खालील प्रमाणे आहे.**

| अ.नं. | विभाग | मिळकत पत्रिकांची संख्या |
|---|---|---|
| १ | **पुणे** | १६३१५१३ |
| २ | **कोकण** | ७९४५६७ |
| ३ | **नाशिक** | ११२४४२६ |

| | | |
|---|---|---|
| ४ | **औरंगाबाद** | ८७२७७८ |
| ५ | **अमरावती** | ५०८२९३ |
| ६ | **नागपूर** | ५२६४५१ |
| | **एकूण** | ५४५८०२८ |

सध्या नगर भूमापन अधिकारी तसेच उप अधीक्षक भूमि अभिलेख कार्यालयात हस्तनोंद पध्दतीने मिळकत पत्रिकेवर फेरफाराची नोंद केली जाते व अभिलेख अद्यावत केले जातात.

१.३ केंद्र शासनाने “ईझ ऑफ डुईंग बिजनेस” (Ease of Doing business) च्या अनुषंगाने सर्व अधिकार अभिलेखांचे संगणकीकरण, फेरफार प्रक्रीयेत सुटसुटीतपणा, तत्परता तसेच किमान मानवी हस्तक्षेप या निकषांचा पुरस्कार केलेला आहे. ही बाब विचारात घेता महाराष्ट्र राज्याच्या नागरी भूमापनाचे अधिकार अभिलेख (मिळकत पत्रिका) यांच्या संदर्भात ही ऑनलाईन फेरफार घेण्याकामी वेब बेस्ड “ई-प्रॉपर्टी कार्ड इन्फर्मेशन सिस्टम” प्रणाली राबविण्याविषयी जमाबंदी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. १ वरील पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. मिळकत पत्रिका ह्या नागरी जनतेशी निगडीत असल्याने तसेच संगणक साक्षरता नागरी भागात जास्त असल्यामुळे ह्या प्रणालीचा वापर अत्यंत उपयुक्त ठरणार असून ही प्रणाली राबविल्यास मिळकत पत्रिकेतील फेरफार ऑनलाईन पध्दतीने होऊन जनतेला अद्ययावत मिळकतपत्रिका तात्काळ मिळण्याची सुविधा उपलब्ध होणार आहे.

१.४ सदर “ई-पी.सी.आय.एस.” संगणक प्रणाली अंतर्गत भूमि अभिलेख कार्यालयासोबतच दुय्यम निबंधक कार्यालयांची जोडणी करणे नियोजित आहे, जेणेकरून दुय्यम निबंधक कार्यालयातील नोंदणीकृत दस्त हे नगर भूमापन कार्यालय तसेच उप अधीक्षक भूमि अभिलेख कार्यालयांना तात्काळ उपलब्ध होतील व त्यानुसार मिळकत पत्रिकेवर फेरफार नोंद घेणे सोईस्कर होईल. तसेच दुय्यम निबंधक कार्यालयांनाही “ई-पी.सी.आय.एस.” ह्या संगणक प्रणालीच्या अनुषंगाने मिळकतीच्या मालकी हक्क इत्यादी विषयी सद्यस्थितीतील डाटा (Real Time Data) उपलब्ध होईल जेणेकरून, खोटे व्यवहार / चुकीच्या नोंदी टाळल्या जातील. या शिवाय “ई-पी.सी.आय.एस.” प्रकल्पाचे फायदे पुढील प्रमाणे आहेत:-

i) सर्व अधिकार अभिलेख डिजीटल स्वरुपात उपलब्ध होतील. तसेच, मागणीप्रमाणे ते जनतेला तात्काळ उपलब्ध करुन देता येतील.

ii) अधिकार अभिलेख ऑनलाईन पध्दतीने अविलंब अद्ययावत होतील.

iii) फेरफार प्रमाणीकरणाची प्रक्रीया सुलभ होईल व फेरफार प्रक्रियेवर प्रभावी नियंत्रण ठेवता येईल.

iv) अभिलेखांचे विनासायास दीर्घकाळ जतन व संवर्धन करता येईल.

v) खातेदारांचे हेलपाटे व त्याअनुषंगाने त्रास वाचून वेळेची व पैशाची बचत होईल.

## १.५ सदर प्रकल्पासाठी खालील प्रमाणे खर्च अपेक्षित आहे

| अ.नं. | बाब | अंदाजे दर (रक्कम रुपयांत) | संख्या | आवश्यक निधी (रक्कम रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | संगणक | ४८,०५४/- | १३८७ | ६६७.०० |
| २ | बायोमेट्रीक डिव्हाईस | ७०००/- | १३८७ | ९७.०९ |
| ३ | डिजिटल सिग्नेचर | ७०५/- (टोकन व सर्टिफिकेटसह | १४५७ | १०.२७ |
| ४ | “ई-पी.सी.आय.एस.” आज्ञावली विकसित करणे | - | - | ११३.०० |
| ५ | सिक्युरिटी ऑडीट करणे | - | - | १०.०० |
| ६ | डाटा युनिकोड व डाटा रिस्ट्रक्चरींग करीता खर्च | - | - | ८१९.०० |
| ७ | प्रशिक्षण (३ दिवसांचे) | रू.१५००/-प्रतिदिन *३ दिवस | १४८७ | ६७.०० |
| ८ | डाटा होस्टींग कॉस्ट आणि रिकरिंग कॉस्ट | - | - | ३२.५० |
| ९ | दोन वर्षाकरीता संगणक प्रणाली व्यवस्थापन | - | - | ४५.०२ |
| १० | आवर्ती खर्च (कनेक्टीव्हीटी, संगणक परिरक्षण खर्च व इतर अनुषंगिक किरकोळ खर्च) | - | - | २५.०० |
| | **एकूण आवश्यक निधी** | | | **१८८६.७९** |

१.६ सदर प्रकल्प मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि. २७/०१/२०१७ च्या बैठकीत चर्चेला आला असता उच्चाधिकार समितीने सदर प्रकल्पाची आज्ञावली “ओपन सोर्स” टेक्नॉलॉजी वापरून महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्यादित (Maharashtra Information Technology Corporation Limited (MITCL) या शासनाच्या कंपनी कडून घेण्याची शिफारस केली असून या प्रकल्पासाठी येणारा खर्च रक्कम रूपये १८८६.७९ लक्ष इतका खर्च नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक यांच्या स्वीय प्रपंजी लेखा Personal Ledger Account (PLA) यामध्ये उपलब्ध असलेल्या निधीतून करण्यासही मान्यता दिलेली आहे.

या पार्श्वभूमीवर उक्त प्रकल्प राबविण्यासंदर्भात खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**निर्णय :-**

२. महाराष्ट्र राज्यातील नगर भूमापन झालेल्या भागात मिळकत पत्रिकांच्या व्यवस्थापनाकरीता ई- प्रॉपर्टी कार्ड इन्फॉरमेशन सिस्टीम (e-PCIS) प्रकल्प राबविण्यास पुढील प्रमाणे शासन प्रशासकीय मान्यता देत आहे:-

i) या प्रकल्पावर होणारा संभाव्य खर्च रक्कम रूपये १८८६.७९ लाख हा नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक यांचे स्वीय प्रपंजी लेखा [Personal Ledger Account (PLA)] या मधील निधीतून करणेत यावा.

ii) या प्रकल्पासाठी आवश्यक असणारा निधी आवश्यकतेनुसार नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य यांनी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य यांचेकडे वर्ग करावा.

iii) e PCIS प्रकल्पासाठी आवश्यक असणारी संगणक आज्ञावली ओपन सोर्स टेक्नॉलॉजी वापरून महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्यादित (Maharashtra Information Technology Corporation Limited (MITCL) यांचेमार्फत विकसित करणेत यावी.

iv) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य) यांनी सदर निधीच्या विनियोजनासाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत तसेच खर्चाचा ताळमेळ महालेखापालांकडे वेळोवेळी देण्याची दक्षता घ्यावी.

v) प्रस्तुत निधीबाबत आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य) पुणे यांनी शासनास वेळोवेळी सादर करावीत.

vi) ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर केला आहे तो त्याच प्रयोजनासाठी खर्च करणे, विनियोगासाठी सर्व प्रचलित वित्तीय नियमांचे पालन करणे, आवश्यक त्या प्रशासकीय मंजू-या घेणे, खर्च विषयक सर्व मूळ कागदपत्रे वेळोवेळी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य यांना तसेच प्रकल्प अंमलबजावणी समितीस सादर करणे, या प्रकल्पाची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे, त्याचे योग्य ते नियंत्रण व समन्वय करणे, तत्संबंधीचे वित्तीय प्रशासकीय, विधानमंडळ, लोकलेखा समिती, महालेखाकार कार्यालय इ. विषयक कामकाज हाताळणे याबाबतची संपूर्ण जबाबदारी जमाबंदी आयुक्त यांची राहील,

०३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौसं. क्रमांक ६/१७/कोषा-५, दि. २५.०१.२०१७ व कार्यासन म-१, महसूल व वन विभाग यांच्या अनौसं. क्र. ३८/म-१, दि. ९.०१.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीनुसार व दि. २७/०१/२०१७ रोजी झालेल्या १०९व्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०३३११३२९५०६८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.03.31 22:50:06 +05'30'

**( डॉ संतोष भोगले )**

शासनाचे उप सचिव,

**प्रत**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (मा.तं), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महानगर आयुक्त, महाराष्ट्र महानगर क्षेत्र विकास प्राधिकरण, वांद्रे, मुंबई
९. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई
११.नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे
१२.जिल्हाधिकारी, मुंबई शहर/ जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा
१३.संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.उप महानिदेशक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे
१५.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१७.संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग ॲप्लिकेशन सेंटर, नागपूर
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१९.राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई
२०.कार्यासन अधिकारी, ब-१ व ब-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२१.निवड नस्ती ल-१.